**श्रीमती वनमाला प्रकाश कोकजे, माजी सहायक संचालक, नगर रचना यांचा सक्तीचा प्रतिक्षा कालावधी "कर्तव्य कालावधी" म्हणून मंजूर करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## नगर विकास विभाग
### शासन निर्णय क्रमांकः सप्रका-१४१७/८६७/प्र.क्र.११६/नवि-२७

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
चौथा मजला, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
तारीख: ०१ जुलै, २०१७

**वाचा :-**

१. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. प्रतिनि-१२१५/५७३/प्र.क्र.१११/नवि-२७, दि.०१.०२.२०१६.
२. आयुक्त, पुणे महानगरपालिका यांचे आदेश क्र.मआ/साप्रवि/आस्था/३५३०, दि.२६.०९.२०१६.
३. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.बदली-५८१६/६७९/प्र.क्र.१७७/२०१६/नवि-२७, दि.३०.१२.२०१६.
४. संचालक, नगर रचना, पुणे यांचे कार्यकारी आदेश क्र.आस्था/बदल्या/ससंनर/२०१६/प्रशा-१/७०२२, दि.३०.१२.२०१६.

**प्रस्तावना :-**

श्रीमती वनमाला प्रकाश कोकजे, माजी सहायक संचालक, नगर रचना यांच्या पुणे महानगरपालिका येथील प्रतिनियुक्तीस संदर्भाधीन दि.०१.०२.२०१६ रोजीच्या आदेशान्वये दि.०६.०३.२०१५ ते दि.०५.०३.२०१६ या कालावधीकरिता मुदतवाढ देण्यात आली होती. तद्नंतर, आयुक्त, पुणे महानगरपालिका यांनी संदर्भाधीन दि.२६.०९.२०१६ रोजीच्या कार्यालयीन आदेशान्वये श्रीमती कोकजे यांना दि.२६.०९.२०१६ (म.नं.) पासून पुणे महानगरपालिकेच्या आस्थापनेवरुन कार्यमुक्त केले होते. त्यामुळे श्रीमती कोकजे ह्या दि.२७.०९.२०१६ पासून पदस्थापनेकरिता सक्तीने प्रतिक्षेत होत्या.

**०२.** नगर विकास विभागाच्या संदर्भाधीन दि.३०.१२.२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये श्रीमती व. प्र. कोकजे, तत्कालिन सहायक संचालक, नगर रचना यांची मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी

पुनर्वसन प्राधिकरण, पुणे व पिंपरी चिंचवड क्षेत्र, पुणे येथील रिक्त असलेल्या “सहायक संचालक, नगर रचना” पदावर बदलीने पदस्थापना करण्यात आली होती. तसेच, संचालक, नगर रचना, पुणे यांच्या दि.३०.१२.२०१६ रोजीच्या कार्यकारी आदेशान्वये त्यांना दि.३१.१२.२०१६ पासून त्यांना बदलीच्या ठिकाणी रुजू होण्याबाबत आदेशित करण्यात आले होते. अशा प्रकारे श्रीमती व. प्र. कोकजे ह्यांना पुणे महानगरपालिका येथून दि.२६.०९.२०१६ (म.नं.) पासून कार्यमुक्त केल्यानंतर ते दि.३१.१२.२०१६ रोजी त्यांची नविन पदस्थापना होईपर्यंत म्हणजेच, दि.२७.०९.२०१६ ते दि.३०.१२.२०१६ या कालावधीत पदस्थापनेकरिता सक्तीने प्रतिक्षेत होत्या. याकरिता श्रीमती कोकजे ह्या व्यक्तीशः जबाबदार नव्हत्या.

**०३.** सबब, श्रीमती व. प्र. कोकजे, तत्कालिन सहायक संचालक, नगर रचना यांचा उक्त दि.२७.०९.२०१६ ते दि.३०.१२.२०१६ हा सक्तीचा प्रतिक्षा कालावधी "कर्तव्य कालावधी" म्हणून मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे शासन आदेश देण्यात येत आहेत:-

**<u>शासन निर्णय:-</u>**

श्रीमती वनमाला प्रकाश कोकजे, माजी सहायक संचालक, नगर रचना यांचा दि.२७.०९.२०१६ (म.पू.) ते दि.३०.१२.२०१६ (म.नं.) हा सक्तीचा प्रतिक्षा कालावधी महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम, १९८१ मधील नियम ९ (१४) (फ) (शर्त क्रमांक ०१) अन्वये "कर्तव्य कालावधी" म्हणून मंजूर करण्यात येत आहे.

**०२.** श्रीमती व. प्र. कोकजे, माजी सहायक संचालक, नगर रचना यांना यांचा दि.२७.०९.२०१६ (म.पू.) ते दि.३०.१२.२०१६ (म.नं.) या कालावधीत प्रशासकीय कारणास्तव पदस्थापनेकरिता सक्तीने प्रतिक्षेत राहावे लागले, याकरिता त्या व्यक्तीशः जबाबदार नव्हत्या.

**०३.** श्रीमती व. प्र. कोकजे, माजी सहायक संचालक, नगर रचना यांना दि.२७.०९.२०१६ (म.पू.) ते दि.३०.१२.२०१६ (म.नं.) या कालावधीतील अनुज्ञेय वेतन व भत्ते अदा करण्याबाबत संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांनी आवश्यक ती कार्यवाही करावी.

**०४.** सदरचे आदेश वित्त विभाग, शासन अधिसूचना क्र.संकीर्ण-२०१५/प्र.क्र.२७/सेवा-६, दि.०३ मार्च, २०१६ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांच्या सचिवांना प्रत्यायोजित करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

**०५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१७०७०११२०५०७११२५** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Eknath Kisan Sahane

Digitally signed by Eknath Kisan Sahane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c2f7e29994246b598ed0f72234360bb639afd8fae26e0e7238d80dcb921ce52a, cn=Eknath Kisan Sahane
Date: 2017.07.04 14:48:07 +05'30'

**( ए.कि.सहाणे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई / महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
२. महालेखापाल (लेखा परिक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई / महालेखापाल (लेखा परिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई / नागपूर.
४. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मध्यवर्ती इमारत, तळ मजला, पुणे. (३-प्रती)
५. सह संचालक, नगर रचना, पुणे विभाग, पुणे.
६. सहायक संचालक, नगर रचना, पुणे शाखा, पुणे.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
८. श्रीमती वनमाला प्रकाश कोकजे, माजी सहायक संचालक, नगर रचना यांना (संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत)
९. निवडसंग्रह / नवि-२७.